विधानमंडळ कामकाज प्राथम्य

विधानमंडळ अधिवेशन कालावधीत मंत्रालयीन विभागांच्या सचिवांनी सभागृहाच्या गॅलरीत उपस्थित राहण्याबाबत व अधिवेशनासंबंधीत कामकाज विहित कालमर्यादेत पूर्ण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
शासन परिपत्रक क्रमांक: विमंअ-२०२२/प्र.क्र.३८ /पाच,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : **२८ फेब्रुवारी, २०२२**

**पहा:-** शासन परिपत्रक,संसदीय कार्य विभाग, क्रमांक : विमंअ-२०२२/प्र.क्र.३२/पाच, दिनांक २३ फेब्रुवारी, २०२२.

## शासन परिपत्रक

महाराष्ट्र विधानमंडळाचे सन २०२२ चे पहिले (अर्थसंकल्पीय) अधिवेशन, विधानभवन, मुंबई येथे गुरुवार, दिनांक ०३ मार्च, २०२२ पासून अभिनिमंत्रित करण्यात आले आहे. विधानमंडळाच्या उभय सभागृहांच्या कामकाजामध्ये कोणत्याही बाबींच्या अनुषंगाने कोणत्याही विभागाचा मुद्दा केव्हाही उपस्थित होऊ शकतो. सबब संबंधित मुद्यांवर तातडीने कार्यवाही होण्यासाठी **विभागांच्या सचिवांची उपस्थिती** मुख्यालयी तसेच, आवश्यकता असेल, त्यावेळेस विधानमंडळाच्या सभागृहाच्या गॅलरीत देखील **अनिवार्य** आहे. विधानमंडळ अधिवेशन काळात सभागृहात ज्या दिवशी त्यांच्या विभागांशी संबंधीत कामकाज, पुरवणी मागण्यांवरील चर्चा व मतदान आणि इतर महत्वाचे कामकाज असेल, त्या दिवशी संबंधित विभागाच्या सचिवांनी सभागृहातील सचिव गॅलरीमध्ये निश्चितपणे उपस्थित रहावे व अन्य सभागृहात निकटतम वरिष्ठ अधिका-यास उपस्थित ठेवावे. तसेच, सभागृहातील चर्चेमध्ये उपस्थित होणा-या मुद्यांबाबतची माहिती संबंधित मा.मंत्री/राज्यमंत्री महोदयांना तात्काळ उपलब्ध केली जाईल, याबाबत दक्षता घ्यावी.

२. वर नमूद बाबी विचारात घेता, सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव / सचिव यांनी अधिवेशनाच्या कालावधीत मुंबई येथे निश्चितपणे उपस्थित रहावे. परंतु काही अनिवार्य कारणांमुळे, त्यांना मुंबईबाहेर दौऱ्यावर जाणे भाग पडल्यास, त्यांनी माझी व त्यांच्या संबंधित मंत्र्यांची पूर्वानुमती घ्यावी व त्यांच्या अनुपस्थितीत विधानमंडळ कामकाज पार पाडण्यासाठी जबाबदार अधिकाऱ्याची नियुक्ती करावी.

३. विधानमंडळाच्या विधानसभा आणि विधानपरिषद सभागृहात तारांकित/अतारांकित प्रश्न, लक्षवेधी सूचना, महाराष्ट्र विधानपरिषद नियम ९३ अन्वयेच्या सूचना, स्थगन प्रस्ताव, औचित्याचे मुद्दे, विशेष उल्लेख इत्यादी संसदीय आयुधांच्या माध्यमातून उपस्थित करण्यात आलेल्या बाबींसंदर्भात शासनाकडून कार्यवाही करण्याचा कालावधी विधानसभा आणि विधानपरिषद नियमांद्वारे विहित करण्यात आलेला आहे. तथापि, अशाप्रकरणी, त्याचप्रमाणे सभागृहात शासनाच्यावतीने देण्यात आलेल्या आश्वासनांवर विहित कालावधीत कार्यवाही न झाल्यामुळे, सन्माननीय सदस्यांकडून नापसंती व्यक्त करण्यात येते. तसेच, त्यासंदर्भात मा.पीठासीन अधिकारी वेळोवेळी बैठका घेऊन अथवा पत्राद्वारे शासनाला सबंधीतांविरुद्ध कडक कार्यवाही करण्याबाबत निदेश देतात. या पार्श्वभूमीवर सन्माननीय सदस्यांनी विविध संसदीय आयुधांद्वारे उपस्थित केलेल्या बाबी विहित कालावधीत निकाली काढण्याच्या तसेच, अशा कोणत्याही बाबी प्रलंबित रहाणार नाहीत याची दक्षता घेण्यात यावी.

४. पूर्वोक्त परिच्छेदात नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता, सन्माननीय सदस्यांकडून विविध आयुधांद्वारे उपस्थित करण्यात आलेल्या बाबींची उत्तरे परिपूर्ण आणि सर्वसमावेशक असतील, तसेच सदर उत्तरे विहित मुदतीत विधानमंडळ सचिवालयास / संबंधीत सन्माननीय सदस्यांना पाठविली जातील आणि आश्वासनपूर्ती अहवाल विहित मुदतीत सादर केले जातील याची सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ व सचिवांनी व्यक्तीश: दक्षता घ्यावी.

५. विविध संसदीय आयुधांद्वारे उपस्थित करण्यात आलेली आणि वरीलप्रमाणे कालमर्यादा आखून दिलेली कोणतीही बाब सदर कालमर्यादेपलीकडे प्रलंबित राहिल्यास, संबंधीत विभागाच्या सचिवांविरुद्ध कडक कारवाई करण्यात येईल. याची कृपया नोंद घ्यावी.

तसेच, उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

६. प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२२०२२८१११९२६६८१५ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

दे. चक्रबर्ती.
( देबाशिष चक्रबर्ती )
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय मंत्रालय, मुंबई.

२. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (अ,ब,ई-१ व ई-२ शाखा) विधानभवन मुंबई
७. सह सचिव/उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग (विधानमंडळ कामकाज समन्वय शाखा),मंत्रालय,मुंबई
८. सर्व कक्ष अधिकारी, संसदीय कार्य विभाग,मंत्रालय,मुंबई
९. निवड नस्ती.